केंद्रपुरस्कृत जल जीवन मिशन योजनेसाठी विशेष घटक कार्यक्रमातंर्गत अनुसूचित जाती प्रवर्गासाठीचा सन २०२१-२२ या आर्थिक वर्षामध्ये निधी वितरण करणेबाबत.
राज्य हिस्सा (लेखाशिर्ष २२१५A०९७)

महाराष्ट्र शासन
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग
शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२१/प्र.क्र.०९ /अर्थसंकल्प (विघयो)
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- ११ जानेवारी, २०२२

वाचा :- १) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.०६.०४.२०२१
२) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.१४.१०.२०२१
३) पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाची नस्ती क्र.जजमि २०२०/प्र.क्र.११०/पापु-१०

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत जल जीवन मिशन कार्यक्रम योजनेसाठी अनुसूचित जाती घटकांकरिता सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-३, २२१५-पाणी पुरवठा व स्वच्छता, ०१, पाणी पुरवठा, ७८९ अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (०२) राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (राज्य हिस्सा ५०टक्के) (कार्यक्रम) (२२१५ए०९७) या लेखाशिर्षाखाली रु.९७६३८८.०० हजार इतका तसेच पुरवणी मागणी व्दारे रु ३१२९६९३.०० हजार एवढा नियतव्यय मंजूर आहे.

वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०६.०४.२०२१ , दि.२४.०६.२०२१ व दि. १४.१०.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये राज्यात कोरोना विषाणूमुळे उद्भवलेली महामारीची परिस्थिती विचारात घेऊन सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता निधी वितरीणाची कार्यप्रणाली ठरवून दिलेली असून खर्चासाठी नियोजनात्मक सूचना केलेल्या आहेत. केंद्र पुरस्कृत जलजिवन मिशन योजनेसाठी वित्त विभागामार्फत सद्यस्थितीत अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर एकूण अर्थसंकल्पीत तरतूदीच्या केंद्र हिस्सा ५०टक्के व राज्य हिस्सा ५० टक्के निधी वितरणासाठी उपलब्ध करुन देण्यात आला आहे. त्यानुसार अनुसूचित जाती घटक कार्यक्रमातंर्गत पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाने वाचा क्र.३ येथील नस्तीवर प्रस्तावित केंद्र पुरस्कृत जल जीवनमिशन कार्यक्रम योजनेसाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरिता राज्य हिस्सा ५०टक्के २२१५ए०९७ या लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पित रु.९७६३८८.०० हजार तरतूदीपैकी मागील २ वर्षातील समरुप तरतूदीच्या अप्राप्त निधीपोटी रु ५३७०१३.४० हजार इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांना अर्थसंकल्पिय निधी वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, समाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०६.०४.२०२१,दि.२४.०६.२०२१ व दि. १४.१०.२०२१ रोजीच्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.०६.०४.२०२१,दि.२४.०६.२०२१ व दि. १४.१०.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात आणि वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.११०५/व्यय-१४, दि.०८.१२. २०२१ अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२२०११२१३१६११९७२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Prashant Pundlik Wagh

Digitally signed by Prashant Pundlik Wagh
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice & Special Assist Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, serialNumber=5599270e38b296e5e5d814ff5976561a3ec66d875aeb425d735e1d7c12140929, cn=Prashant Pundlik Wagh
Date: 2022.01.12 13:16:53 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई
४) संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, शासकीय परिवहन सेवा, वरळी, मुंबई
५) सर्व प्रादेशिक उप आयुक्त (समाजकल्याण) (समाजकल्याण आयुक्तालयामार्फत)
६) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
७) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
८) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
९) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (पापु-२२), मंत्रालय, मुंबई
१०) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग